**१३ वा वित्त आयोग**
**(सन २०१०-२०१५)**

**१३व्या वित्त आयोगाच्या जनरल बेसिक ग्रँट , जनरल परफॉर्मन्स ग्रँट , स्पेशल एरिया बेसिक ग्रँट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रँटच्या निधीचे वितरण ग्रामपंचायत स्तरावर करताना विचारात घ्यावयाच्या निकषांमध्ये बदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक,क्रमांक- तेविआ २०१०/ प्र.क्र. २२ /वित्त-४**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक - ८ नोव्हेंबर,२०१०.**

संदर्भ-शासन निर्णय,क्रमांक- तेविआ २०१०/ प्र.क्र. २२ /वित्त-४,दिनांक - ३०/८/२०१०

**प्रस्तावना :-**

तेराव्या वित्त आयोगांतर्गत राज्यातील पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणासाठी **जनरल बेसिक ग्रँट, जनरल परफॉर्मन्स ग्रँट, स्पेशल एरिया बेसिक ग्रँट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रँट** च्या स्वरुपात प्राप्त होणाारा निधी राज्यातील पंचायत राज संस्थांसाठी वितरीत करण्याबाबतचे निकष, वितरीत निधीतून पंचायत राज संस्थांनी करावयाच्या बाबी तसेच, निधी खर्च करताना पंचायत राज संस्थांनी पालन करावयाची मार्गदर्शक तत्त्वे/मार्गदर्शक सूचना याबाबत संदर्भीय शासन निर्णयान्वये सर्व पंचायत राज संस्थांना अवगत करण्यात आले आहे. त्यानुसार ग्रामपंचायत स्तरावर निधी वितरीत करण्यासाठी खालील निकष देण्यात आले होते.

| अ.क्र. | निकष | ग्रामपंचायत (टक्केवारी) |
|---|---|---|
| १ | ग्रामपंचायतीची लोकसंख्या. | ४०% |
| २ | ग्रामपंचायतीतील अनुसूचित जाती व जमातीच्या लोकसंख्येचे प्रमाण. | १०% |
| ३ | वित्त आयोगाच्या निधीच्या खर्चाचे प्रमाण. | १०% |
| ४ | इकोग्राम योजनेची अंमलबजावणी | १५% |
| ५ | प्लॅन प्लस सॉफ्टवेअरचा वापर | ०५ % |
| ६ | यशवंत पंचायतराज अभियानाची अंमलबजावणी - | ०५% |
| ७ | भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांनी ठरवून दिलेल्या सुधारीत नमून्यात लेखे ठेवण्याची अंमलबजावणी करणे. (प्रिया सॉफ्ट ) | १०% |
| ८ | ग्राम रचना आराखडा मंजूर असलेल्या ग्रामपंचायती (D.P.Plan) | ०५ % |

तथापि उपरोक्त निकषानुसार ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करताना निकष क्रमांक-५ (प्लॅन प्लस सॉफ्टवेअरचा वापर) व निकष क्रमांक-८ ( ग्राम रचना आराखडा मंजूर असलेल्या ग्रामपंचायती (D.P.Plan) ) बाबत अडचणी उपस्थित होत असल्याने त्या दोन निकषांबाबत मार्गदर्शन करण्याची विनंती अनेक जिल्हा परिषदांनी शासनाकडे केली आहे. निकष क्र.५ ची अंमलबजावणी सद्य:स्थितीत राज्यात BRGF योजना कार्यान्वित असलेल्या १२ जिल्ह्यामध्ये होते. इतरत्र होत नाही. तसेच, निकष क्रमांक-८ ची अंमलबजावणी सार्वत्रिकपणे सर्व जिल्ह्यांमधील ग्रामपंचायतीत केली जात नाही.त्यामुळे सदर २ निकषांमध्ये तात्पुरत्या स्वरुपात बदल करण्याबाबत या परिपत्रकाद्वारे पुढील सूचना देण्यात येत आहेत.

**<u>शासन परिपत्रक-</u>**

१३ व्या वित्त आयोगाचा जनरल बेसिक ग्रँट, जनरल परफॉर्मन्स ग्रँट, स्पेशल एरिया बेसिक ग्रँट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात प्राप्त होणारा निधी ग्रामपंचायत स्तरावर वितरीत करण्यासाठी संदर्भिय शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या खालील निकषांमध्ये शासनस्तरावरुन पुढील आदेश होईपर्यंत **"अ" व "ब" मध्ये** सूचीत केल्यानुसार बदल करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | निकष | ग्रामपंचायत (टक्केवारी) |
|---|---|---|
| १ | ग्रामपंचायतीची लोकसंख्या. | ४०% |
| २ | ग्रामपंचायतीतील अनुसूचित जाती व जमातीच्या लोकसंख्येचे प्रमाण. | १०% |
| ३ | वित्त आयोगाच्या निधीच्या खर्चाचे प्रमाण. | १०% |
| ४ | इकोग्राम योजनेची अंमलबजावणी | १५% |
| ५ | प्लॅन प्लस सॉफ्टवेअरचा वापर | ०५ % |
| ६ | यशवंत पंचायतराज अभियानाची अंमलबजावणी - | ०५% |
| ७ | भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांनी ठरवून दिलेल्या सुधारीत नमून्यात लेखे ठेवण्याची अंमलबजावणी करणे. (प्रिया सॉफ्ट ) | १०% |
| ८ | ग्राम रचना आराखडा मंजूर असलेल्या ग्रामपंचायती (D.P.Plan) | ०५ % |

(अ) ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करताना निकष क्रमांक-५ (प्लॅन प्लस सॉफ्टवेअरचा वापर) चे ५ टक्के प्रमाण ग्रामपंचायतीच्या लोकसंख्येसाठी असलेल्या ४० टक्के प्रमाणात समाविष्ट करुन ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे,

(ब) निकष क्रमांक-८ ( ग्राम रचना आराखडा मंजूर असलेल्या ग्रामपंचायती (D.P.Plan) ) चे ५ टक्के प्रमाण ग्रामपंचायतीच्या लोकसंख्येसाठी असलेल्या ४० टक्के प्रमाणात समाविष्ट करुन त्यानुसार ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे.

सदरचे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक- **२०१०१११८१८१०४२००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.विधानसभा व विधान परिषद सदस्य.
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त.(महसूल)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
मुख्य लेखा परिक्षक , स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग (व्यय-१५/अर्थोपाय / वित्त आयोग कक्ष.)
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ( सर्व कार्यासने )
निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२